मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील रस्त्याची दर्जोन्नती करण्यासाठी नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्रशासन

## ग्राम विकास विभाग

## शासननिर्णयक्रमांकः मुग्रायो-२०२३/प्र.क्र.३३/बांधकाम-४

बांधकाम भवन, ५वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०२ जून, २०२३

**वाचा:**

१) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५.

२) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांधकाम-४, दिनांक ०६ जानेवारी, २०२२.

३) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.०७/बांधकाम-४, दिनांक २१ एप्रिल, २०२२.

४) **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.१९/बांधकाम-४, दिनांक २६ सप्टेंबर, २०२२.

५) **शासनपत्र, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२२/प्र.क्र.४६९/बांधकाम-४, दिनांक २० ऑक्टोबर, २०२२.

६) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणेयांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/ २४२२/२०२२, दिनांक २९/१२/२०२२.

७) **शासन निर्णय क्रमांक: मुग्रायो** २०२३/प्र.क्र. ३३/ बांध ४, दिनांक १० फेब्रुवारी,२०२३

८) **मुख्य अभियंता, ( प्रमंग्रासयो) , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्र** मु.अ प्रमंग्रासयो /७२२/ २३, दिनांक १ मार्च ,२०२३

**शासननिर्णय:**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील १५ रस्त्यांची दर्जोन्नती करण्यासाठी उपरोक्त वाचा मधील अ.क्र. ७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि, प्रस्तुत शासन निर्णयातील अनुक्रमांक ३ येथील पन्हाळा तालुक्यातील शाहुवाडी T.B ते सातवे शिंदेवाडी बोरीवडे ते बोंगेवाडी या रस्त्याची धावपट्टी ३.७५ मी.रुंदीने अंतर्भूत करुन अंदाजित किंमत १००१.४४ लक्ष व ५ वर्षीय देखभाल दुरुस्ती किंमत ६१.५० लक्ष इतकी दर्शविण्यात आली आहे. तथापि, मुख्य अभियंता, (प्रमंग्रासयो), पुणे यांच्या संदर्भ क्रमांक ०८ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या निकषान्वये सदर रस्ता साखर कारखान्यापासुन १० किमी अंतरावर येत असल्याने व परिसरातील उस लागवड क्षेत्र व रस्त्यावरुन होणाऱ्या उस वाहतुक वर्दळीचे

सर्वेक्षण केले असता रस्त्याची धावपट्टी ५.५० मी. रुंदीची आवश्यकता असल्याचे नमुद केले आहे. सबब, संदर्भ क्रमांक ०७ येथील निर्णयातील अ.क्र. ३ येथील पन्हाळा तालुक्यातील सदरहू रस्त्याची प्रशासकीय मान्यता अधिक्रमित करून आता या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता,( प्रमंग्रासयो ), पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार सदर रस्त्याची धावपट्टी ५.५० मी. रुंदी विचारात घेऊन येणाऱ्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटीस अधीन राहुन नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे त्यानुसार कोल्हापूर जिल्ह्यातील आशियाई विकास बॅक अर्थसहाय्यित प्रकल्पातील रस्त्यांकरीता खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | लांबी (कि.मी) | अंदाजित किंमत | कामाची नियमीत ५ वर्ष देखभाल दुरूस्ती किंमत (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | शाहूवाडी | ADB-KOL-०१ | इजिमा ०३ मधलीवाडी पुसार्ले ते धनगरवाडी रस्ता. | ९.७७० | ९४१.६२ | ५९.९९ |
| २ | | | प्रजिमा ०२ भेंडवडे ते केदार लिंगवाडी रस्ता. | ५.८५० | ६१३.१९ | ४०.९५ |
| ३ | पन्हाळा | ADB-KOL-०२ | शाहुवाडी T.B ते सातवे आवळी बोरीवडे ते बोंगेवाडी रस्ता. | ९.७३० | १२६८.७१ | ७५.५० |
| ४ | आजरा | ADB-KOL-०३ | शेळप ते आंबार्डे लिंगवाडी रस्ता | ६.७१० | ५५३.०३ | ३२.४८ |
| ५ | | | रा.मा. २०१ ते वाटंगी तालुका हद्द रस्ता. | ३.८५० | ३५०.१७ | १८.४६ |
| ६ | करवीर | ADB-KOL-०४ | वडणगे ते केर्ली रस्ता. | ३.७०० | २७७.२८ | १६.०९ |
| ७ | गगनबावडा | | पळसंबे ते सैतवडे रस्ता. | ३.०३० | ३२३.९४ | २०.७३ |
| ८ | शिरोळ | ADB-KOL-०५ | रा.मा -.१५३ शिरोळ ते कानवाड रस्ता. | ५.९०० | ५३१.३७ | २६.१५ |
| ९ | | | प्रजिमा २३ औरवाड ते आलास | ६.००० | ४४८.२९ | २१.६२ |
| १० | भुदरगड | ADB-KOL-०६ | बेडीव ते (झुलपेवाडी) तालुका हद्द रस्ता. | ५.१८० | ४९३.४९ | ३५.१५ |
| ११ | राधानगरी | | प्रजिमा २६ म्हासुर्ली ते मानेवाडी | ३.८२० | ३७२.६४ | २१.२४ |
| १२ | चंदगड | ADB-KOL-०७ | रामा १८० ते प्रजिमा ६७ म्हाळेवाडी रस्ता. | ७.०८० | ५८३.१९ | ३६.९५ |
| १३ | | | प्रजिमा ६५ कोवाड ते नडगड्डी रस्ता. | ९.७०० | ९६५.६६ | ६१.१० |
| १४ | गडहिंग्लज | ADB-KOL-०८ | प्रजिमा ५७ खमलेहट्टी -चिंचेवाडी नौकूड ते हासूर सासगिरी रस्ता. | ६.८७५ | ५०२.५३ | २८.६४ |
| १५ | | | रा.मा. १८९ वाघराळी ते नेसरी रस्ता. | ७.०६० | ५५१.७४ | २९.२६ |
| एकूण १५ कामे | | | | ९४.२५५ | ८७७६.८५ | ५२४.३१ |

१. सदर कामे ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत,प्रधानमंत्रीग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्रामविकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), पुणे, संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) व संबंधित कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दि.२५.१०.२०१८ तसेच शासन पत्र क्रमांक मुग्रायो २०१९/प्र.क्र.७३/बांध-४ दिनांक २२ जानेवारी,२०१९ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार प्रत्येक रस्त्याला तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता तसेच संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी रस्त्याचे दर्जोन्नती करण्यासाठी ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरु करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी रस्त्याच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुनश्च:काटेकोरपणे तपासण्यात येवुन त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) सदर रस्त्यासाठी लागणारी जमीन याविभागाच्या ताब्यात आहे याची खातर जमा करुन घ्यावी.खाजगी जमीन अथवा वनविभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात येवु नयेत,याबाबत पुन:श्चखात्री करण्यात यावी.

iii) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे/जलविद्युत पाणी पुरवठा प्रकल्पाच्या जलाशया खाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे याकामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्रीकरावी.

iv) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी. तसेच नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) योजनेच्या सुधारित अटी व शर्तीनुसार RIDF अंतर्गत सुरू असलेल्या प्रकल्पांच्या स्थळी प्रकल्पाची माहिती दर्शविणारा विहित नमुन्यातील फलक लावण्यात यावा.

v) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन/दर/दरपृथ:करण/रक्कम/दरपृथ:करणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. यासंदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vi) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वा व अन्य कोणत्याही योजनेत/ कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही, याचीखातरजमाकरावी. तसेच प्रस्तावित लांबीत कोणतीही कामे दोष दायित्व कालावधीत नसल्याची खात्री करण्यात यावी.

vii) सदर कामांना प्रचलित दरसूचीनुसार तांत्रिक मंजूरी देण्यात यावी.

viii) सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

ix) सदर कामे डोंगरी/ आदिवासी / नक्षलप्रभावीत क्षेत्र अथवा साखर कारखान्यापासून १५ कि.मी. त्रिज्या क्षेत्रांमध्ये शासनाच्या प्रचलित निर्णयानुसार येत असल्याबाबत तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांने तपासणी करुन दरपृथ:करणामध्ये त्यानुसार तरतुद केले बाबत

खातर जमा करावी. याबाबतची सर्व जबाबदारी ही संबंधित तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकारी/ अभियंत्याची राहील.

०२. सदर कामावरील खर्च“मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग३३७, रस्त्यांची बांधकामे(०२)बाह्य सहाय्यित प्रकल्प (०२)(०१) आशियाई विकास बँक सहाय्यित ग्रामीण रस्ते विकास पायाभूत सुविधा प्रकल्प (बाह्य हिस्सा ७० %) (कार्यक्रम) ५३ मोठीबांधकामे सीआरसी- ५०५४ ५२९८”तसेच “मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग३३७, रस्त्यांची बांधकामे(०२)बाह्य सहाय्यित प्रकल्प (०२) (०२) आशियाई विकास बँक सहाय्यितग्रामीण रस्ते विकास पायाभूत सुविधा प्रकल्प (राज्य हिस्सा ३० %)(कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे सी.आर.सी. ५०५४-५३०४” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०२१४२००५१४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.06.09 11:10:49 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. विधानसभा /विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी,कोल्हापूर
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,कोल्हापूर
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय मुंबई-३२.
७) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
८) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थापुणे विभाग, पुणे
९) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,जिल्हा कोल्हापूर
१०) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद,कोल्हापूर
११) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,कोल्हापूर
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१३) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य
१४) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.